# महाराष्ट्र शासन

क्रमांक : संकीर्ण०१२२/प्र.क्र.१०/१३-स
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
मंत्रालय विस्तार इमारत, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ जानेवारी, २०२२.

वाचा:- १. महसुल व वन, आपत्ती व्यवस्थापन,मदत व पुनर्वसन विभागाचे दिनांक ०८ जानेवारी, २०२२ रोजीचे आदेश.

## आदेश

ज्याअर्थी, राज्यात कोविड-१९ महामारीचा असलेला प्रादुर्भाव व सद्यस्थितीत राज्यामध्ये ओमायक्रॉन या उत्परिवर्तीत विषाणूंचे वाढते संक्रमण या सर्व बाबींचा विचार करून, विषाणूचे संक्रमण रोखणे व नियंत्रित करण्यासाठी काही आपत्कालीन उपाययोजना करणे अत्यावश्यक असल्याने आपत्ती निवारण, मदत व पुनर्वसन विभागाच्या वाचा क्र. १ येथील आदेशान्वये राज्यात निर्बंध लागू करण्यात आलेले आहेत. सदर आदेशामध्ये कोविड प्रतिबंधात्मक उपाययोजना म्हणून गर्दी व्यवस्थापन करण्याबाबत गर्दी/ जमावाचे नियोजन करणे, निवडणूका याबाबत सूचना दिलेल्या आहेत. यामधील तरतुदींनुसार सामाजिक, धार्मिक, सांस्कृतिक व राजकीय मेळाव्यांसाठी जास्तीत जास्त ५० लोकांची मर्यादा निश्चित केलेली असणे;

ज्याअर्थी, सोलापूर, सातारा व कोल्हापूर जिल्ह्यामध्ये यापूर्वी अशा प्रकारे निवडणूक प्रक्रिया राबविण्यात आली असता, निवडणूकीनंतर या सर्वच संबंधित जिल्ह्यांमध्ये कोविड-१९ रुग्णांची संख्या लक्षणीयरित्या वाढल्याचे निदर्शनास आले आहे. त्याचप्रमाणे, आरोग्य विभागाच्या दिनांक २० जानेवारी, २०२२ रोजीच्या अहवालानुसार सर्वाधिक दैनंदिन रुग्णवाढ ही पुणे जिल्ह्यात असणे;

ज्याअर्थी, पुणे जिल्ह्यात कोव्हीड-१९ चा वाढत असलेला प्रादुर्भाव आणि त्यामुळे, रुग्णांची मोठ्या प्रमाणात वाढत असलेली संख्या, राजगड सहकारी साखर कारखान्याचे पुणे जिल्ह्यातील भोर, वेल्हा व हवेली या तालुक्यात असलेले कार्यक्षेत्र व कारखान्याची सुमारे १३९०० सभासद संख्या विचारात घेता कोव्हीड -१९ च्या संसर्गात होणारी वाढ रोखण्यासाठी राजगड सहकारी साखर कारखाना लि.अनंतनगर-निगडे, ता.भोर,जि.पुणे या संस्थेची निवडणूक सद्यस्थितीत पुढे सुरू ठेवणे उचित होणार नाही अशी शासनाची खात्री झाली आहे;

त्याअर्थी, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम १५७ मधील तरतूदीनुसार शासनास असलेल्या अधिकारात कलम ७३ कक मधील तरतूदीला सुट देवून, आरोग्य विभागाच्या दि. २० जानेवारी, २०२२ रोजीच्या अहवालानुसार पुणे जिल्ह्यात सर्वाधिक झालेली रुग्णवाढ विचारात घेवून, राजगड सहकारी साखर कारखाना लि.अनंतनगर-निगडे, ता.भोर,जि.पुणे या संस्थेची निवडणूक ज्या टप्प्यावर असेल त्या टप्प्यावर या आदेशाच्या दिनांकापासून पुढील तीन महिन्यांपर्यंत पुढे ढकलण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०१२४११५११५५४००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chaudhary Anil Jayaram

Digitally signed by Chaudhary Anil Jayaram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce,
serialNumber=d124ae9bbd15bed87dbd08ef779cf1b85a4020339eb1c2ef0e112fb67063011c, cn=Chaudhary Anil Jayaram
Date: 2022.01.24 11:52:40 +05'30'

**( अनिल ज. चौधरी )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे.
२. सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, पुणे.
३. प्रादेशिक सहसंचालक,साखर, पुणे विभाग पुणे.
४. निवडनस्ती, कार्यासन १३-स.